**सन २०१९-२० या वर्षाकरिता अखिल भारतीय सेवा (कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ प्रमाणे भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी करुन घ्यावयाच्या वैद्यकीय तपासण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.एएफओ-१११९/प्र.क्र. १९६/फ-७अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई.४०००३२.
दिनांकः १८ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांसाठी सन २००८-०९ या वर्षापासून अखिल भारतीय सेवा (कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ हे नियम लागू करण्यात आलेले आहेत. या नियमाप्रमाणे ४० वर्ष किंवा अधिक वय असलेल्या भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांच्या वैद्यकीय तपासण्या दरवर्षी करुन घेणे बंधनकारक आहे. त्यांच्या वैद्यकीय तपासणीच्या अहवालाचा सारांश त्यांच्या वार्षिक कार्यमुल्यांकन अहवालासोबत जोडणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१९-२० या वर्षी राज्यातील ४० वर्ष किंवा अधिक वय असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय तपासण्या करण्यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय सेवा (कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ मधील नियम ३ व त्यासोबतचा नमुना ४ अनुसार दि.३१.३.२०१९ रोजी ४० वर्षे किंवा अधिक वय असलेल्या भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांची विहित वैद्यकीय तपासणी सोबतच्या प्रपत्र “अ” मध्ये नमूद केल्यानुसार महसूल विभागनिहाय मान्यताप्राप्त खाजगी रुग्णालयातून करुन घ्यावी. सदर वैद्यकीय तपासणी करताना पुढील सूचना अंमलात आणाव्यात.

१) महाराष्ट्र राज्य संवर्गातील दि.३१.३.२०१९ रोजी ४० वर्ष किंवा अधिक वयाच्या भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी ते कार्यरत असलेल्या महसूल विभागातील प्रपत्र “अ” मध्ये दर्शविलेल्या खाजगी रुग्णालयातून /वैद्यकीय संस्थामधून प्रपत्र “ब” मध्ये नमूद केलेल्या सर्व वैद्यकीय तपासण्या चालू वर्षी (२०१९-२०) करुन घ्याव्यात.

२) अमरावती महसूल विभागात कार्यरत असलेल्या भावसे अधिकाऱ्यांनी त्यांना जवळ असणाऱ्या इतर महसूली विभागासाठी निश्चित केलेल्या खाजगी रुग्णालयांतून सदर वैद्यकीय तपासणी करुन घ्यावी.

३) प्रपत्र-ब मध्ये विहित केलेल्या सर्व वैद्यकीय तपासण्या करण्याची सुविधा उपलब्ध असलेल्या संबंधित जिल्हयातील शासकीय रुग्णालये अथवा महसूली विभागातील शासकीय/ महानगरपालिका रुग्णालयांमध्ये देखील वैद्यकीय तपासणी करुन घेता येईल.

४) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३१ मार्च, २०२० पर्यंतच्या कालावधीत भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी संबंधित खाजगी रुग्णालयांशी परस्पर संपर्क साधून, वैद्यकीय तपासणीच्या तारखा निश्चित करुन घ्याव्यात व प्रपत्र-ब मध्ये विहित केलेली वैद्यकीय तपासणी करुन घ्यावी.

५) भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्या-त्या महसूली विभागासाठी नेमलेल्या रुग्णालयांतून अथवा शासकीय किंवा महानगरपालिका रुग्णालयांमधून प्रपत्र-ब मध्ये दर्शविलेल्या सर्व वैद्यकीय तपासण्या करुन घेतल्यानंतर सदर रुग्णालयाला वैद्यकीय चाचण्यांसाठी आवश्यक असलेली रक्कम प्रथम स्वत: अदा करावी व त्याची प्रतिपूर्ती आपल्या कार्यालयातून मिळवावी. या शासन निर्णयान्वये वार्षिक वैद्यकीय तपासणीच्या खर्चाची प्रतिपूर्ती घेणाऱ्या अधिकाऱ्यांना, शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.एमएजी-१०९८/प्रक्र.२२०/आरोग्य-३, दि.३१ ऑगस्ट, २००६ अन्वये दर दोन वर्षातून एकदा अनुज्ञेय असलेली वैद्यकीय तपासण्यांवरील खर्चाची प्रतिपूर्ती देय राहणार नाही.

६) शासनाने वैद्यकीय तपासणीसाठी निश्चित केलेल्या खाजगी रुग्णालयांनी तसेच शासकीय किंवा महानगरपालिका रुग्णालयांनी त्यांचेकडील भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांचे वैद्यकीय तपासणीचे एकत्रित अहवाल कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग (कार्यासन फ-७), दालन क्र.४६० (विस्तारीत इमारत), चौथा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२ या पत्यावर पाठवावेत. तसेच वैद्यकीय तपासणी झाल्यानंतर प्रस्तुत तपासणी अहवालाची एक प्रत संबंधित भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनाही द्यावी.

७) प्रपत्र-ब मध्ये दर्शविलेल्या सर्व वैद्यकीय तपासण्या एकाच ठिकाणी व एकाच दिवशी करण्यात येतील. परंतु अपवादात्मक प्रकरणी काही कारणास्तव सर्व तपासण्या एका दिवसात करणे शक्य न झाल्यास, लगतच्या दुसऱ्या दिवशी त्या करुन घ्याव्यात. भारतीय वन सेवेतील अधिकारी आणि संबंधित रुग्णालये, यांनी तपासणीचा दिनांक व वेळ परस्पर ठरवून घ्यावी. तसेच भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी वैद्यकीय तपासण्यांसाठीची पूर्व तयारी/ खबरदारी सुध्दा (precautions) रुग्णालयाच्या सल्याने घ्यावी.

८) वैद्यकीय तपासणीस जाण्यापूर्वी अधिकाऱ्यांनी, त्यांच्या लगतच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास ते वैद्यकीय तपासणीसाठी मुख्यालयात अथवा मुख्यालयाबाहेरील रुग्णालयात जाणार असल्याबाबची पूर्वकल्पना द्यावी.

९) वैद्यकीय तपासण्यांचा १ दिवस हा कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून समजण्यात येईल. सदर तपासण्या शासकीय सुट्टीच्या दिवशी केल्यास त्यासाठी कोणतीही रजा/बदली रजा अनुज्ञेय असणार नाही.

१०) वैद्यकीय तपासणीचा कालावधी हा कर्तव्य कालावधी समजल्यामुळे भारतीय वन सेवेतील अधिकारी अन्यथा दौऱ्यावर असतांना, त्यांना ज्या दराने प्रवासभत्ता/ दैनंदिन भत्ता दिला जातो, त्या दराने तो (लागू असल्यास) देय राहील. असा प्रवास भत्ता/दैनिक भत्ता यांचे दर वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार, देय राहतील. याबाबतची परिगणना संबंधित अधिकाऱ्यांना वेतन प्रदान करणाऱ्या कार्यालयाने करुन त्याचे प्रदान करावे.

११) वैद्यकीय तपासणीसाठी होणारा खर्च, संबंधित अधिकाऱ्याच्या आस्थापनेवरील वेतन व भत्यांसाठी लागू असलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र यासाठी आर्थिक वर्षाचे बंधन राहणार नाही.

१२) भारतीय वन सेवेतील अधिकारी कार्यरत असणाऱ्या महसूल विभागाशिवाय अन्य महसूल विभागातील रुग्णालयात वैद्यकीय तपासण्या करु इच्छित असल्यास, त्यांना इच्छित महसूल विभागातील प्राधिकृत केलेल्या रुग्णालयात अनुज्ञेय केलेल्या दरानुसार वैद्यकीय तपासण्या करुन घेण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय तपासण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाद्वारे दि.११ डिसेंबर, २०१९ रोजी व दि.१३ डिसेंबर, २०१९ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या आधारे भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय तपासण्यांबाबत उचित शासन निर्णय निर्गमित करण्यास वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१२/सेवा-५, दि.२२.१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमती अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२१८१४४२१४१४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.12.18 14:49:12 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

२) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

४) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

९) महाराष्ट्र संवर्गातील ४० वर्षावरील भारतीय वन सेवेतील अधिकारी द्वारे प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१०) प्रपत्र-अ मधील सर्व खाजगी रुग्णालये.

११) सर्व शासकीय, महानगरपालिका रुग्णालयाचे अधिष्ठाता/जिल्हा शल्य चिकीत्सक.

१२) सहाय्यक संचालक (भावसे लेखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) निवडनस्ती, फ-७.

## शासन निर्णय क्र.एएफओ-१११९/प्रक्र.१९६/फ-७ अ, दिनांक १८/१२/२०१९ चे सहपत्र

## प्रपत्र-अ

| अ. क्र. | विभाग आणि त्याखालील जिल्हे | भा.व.से. अधिकाऱ्यांची तपासणी करुन घेण्याकरिता निश्चित केलेले रुग्णालयाचे नाव , संपर्क अधिकारी व दुरध्वनी क्रमांक | |
|---|---|---|---|
| | | रुग्णालयाचे नाव | संपर्क अधिकारी व दुरध्वनी क्रमांक |
| १. | **मुंबई /कोकण विभाग**<br>मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, पालघर. | बॉम्बे हॉस्पिटल अँड मेडिकल रिसर्च सेंटर, मुंबई-२०. | डॉ. नरसिंह रेड्डी, वरिष्ठ व्यवस्थापक, जी. एम. मार्केटींग,<br>दु.क्र.०२२-२२०८८३२३<br>Mob. No.९८२०६२८२८०<br>Mail-narsim७३@gmail.com |
| | | दि अपोलो क्लिनिक, कुलाबा, मुंबई. | डॉ. दिपाली ननावरे<br>Hosp.-०२२-२२०२११२२/८८/६६<br>Mob. No.-८४५०९८२२२५/६ |
| २. | **पुणे विभाग**<br>सांगली, सातारा, पुणे, कोल्हापूर, सोलापूर | रुबी हॉल क्लिनिक, ४०, ससून रोड, पुणे-४११००१. | श्रीमती हंसा कोटक, वरिष्ठ व्यवस्थापक, वैद्यकीय सेवा,<br>Mob. ९४२२३१०५०५<br>Hos.-०२०-६४९४९४९ /६६४५५१०० |
| | | आदित्य बिर्ला मेमोरियल, हॉस्पीटल, चिंचवड, पुणे-४११०३३. | श्री. सचिन सामेल<br>दु.क्र.०२०-३०७१७५००/४०७०७५००<br>Mob.No.-९८८११२३०३९ |
| ३. | **नागपूर विभाग**<br>नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया, गडचिरोली, वर्धा | अरनेजा हार्ट ॲण्ड मल्टीस्पेशालिटी हॉस्पीटल, रामदास पेठ, नागपूर-४४००१०. | श्रीमती अनुराधा सांबरे<br>दु.क्र.-०७१२-६६६१८००<br>Mob. No.९८२३०६६७२१ |
| ४. | **नाशिक विभाग**<br>नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर | सुयश मेडीलकल फाऊंडेशन प्रा. लि., सुयश हॉस्पिटल, अहिल्याबाई होळकर मार्ग, महामार्ग बस स्टँड शेजारी, मुंबई नाका, नाशिक | डॉ. हेमंत ओस्तवाल, व्यवस्थापकीय संचालक,<br>Mob. No.-९४२२२५८७७७<br>Hos.-०२५३-२३१८९९०/९१/९३ |
| ५. | **औरंगाबाद विभाग**<br>औरंगाबाद, बीड, जालना, परभणी, नांदेड, हिंगोली, लातूर, उस्मानाबाद | एजी जी एम मेडीकल सेंटर अँड रिसर्च सेंटर, औरंगाबाद. | डॉ. अजय शिंदे, रुग्णालय प्रशासक,<br>Mob. No. -९८२३४९९९९४<br>Hos.-०२४०-६६०११०० |
| ६. | **अमरावती विभाग**<br>अमरावती, यवतमाळ, अकोला, बुलढाणा, वाशिम | अमरावती विभागात कार्यरत संबंधित भावसे अधिकाऱ्यांनी त्यांना जवळ असणाऱ्या इतर महसूली विभागातील शासनाने निश्चित केलेल्या रुग्णालयांतून सदर वैद्यकीय चाचण्या करुन घ्याव्यात. | |

# प्रपत्र 'ब'

## Annexure

## From IV

[See Rule 3]

**(Details of the medical tests to be conducted)**

**Date:**

**Name:** **Age:** **Years** **Sex: M/F**

**A. Investigations Reports**

| | |
|---|---|
| 1. | **(a) Haemogram**<br>(i) Haemoglobin<br>(ii) TLC (Total Leukocyte Count)<br>(iii) DLC (Differential Leukocyte Count)<br>(a) Polymorphs<br>(b) Lymphocytes<br>(c) Eosinophils<br>(d) Basophils<br>(e) Monocytes<br>(iv) Peripheral Smear<br>**(b) Thyroid Profile**<br>i) T3<br>ii) T4<br>iii) TSH<br>**(c) Vit.B12 test**<br>**(d) Vit. D3 test** |
| 2. | **Urine Examination**<br>(i) Colour<br>(ii) Albumin<br>(iii) Sugar<br>(iv) Microscopic Exam<br>**Stool routine**<br>(i) Ova, cyst<br>(ii) Occult blood |
| 3. | **Blood Sugar**<br>(i) Fasting<br>(ii) Post-Prandial<br>(iii) HbA 1C<br>(iv) Insulin (Fasting) |

| | |
|---|---|
| 4. | **Lipid Profile**<br>(i) Total Cholesterol<br>(ii) HDL Cholesterol (High Density Lipoprotein Cholesterol)<br>(iii) LDL Cholesterol ( Low Density Lipoprotein Cholesterol)<br>(iv) VLDL Cholesterol ( Very Low Density Lipoprotein Cholesterol)<br>(v) Triglycerides |
| 5. | **Liver Function Tests**<br>(i) S. Bilirubin (Total) (Serum Bilirubin)<br>(ii) S. Bilirubin (Direct) (Serum Bilirubin)<br>(iii) S.G.O.T. (Serum glutamic oxaloacetic transaminase)<br>(iv) S.G.P.T. (Serum glutamic pyruvic transaminase)<br>(v) Australia Antigen Test (Hepatitis B)<br>(vi) Serum Total Proteins<br>Albumin, Globilin, A/G ratio<br>(vii) Prothrombin time (P.T) INR |
| 6. | **Kidney Function Tests**<br>(i) Blood Urea<br>(ii) S. Creatinine (Serum Creatinine)<br>(iii) S. Uric Acid (Serum Uric Acid)<br>(iv) Na+ (sodium)<br>(v) K (Potassium)<br>(vi) calcium<br>(vii) Inorganic Phosphorus |
| 7. | **Cancer screening**<br>**(A) <u>For Men</u>**<br>(i) PSA (Prostate Specific Antigen test)<br>(ii) LDH (Lactic Acid Dehydrogenase test)<br>**(B) <u>For Women</u>**<br>(i) PAP SMEAR ( Papanicolaou test) |
| 8. | X-Ray-Chest PA View Report |
| 9. | ECG Report (Electro Cardiogram Report) |
| 10 | USG Abdomen with pelvis ( Ultrasonography Abdomen with pelvis Report) |
| 11. | TMT Report (Treadmill test)/Stress test |
| 12. | Mammography Report (Women) |
| 13. | **Gynaecological Health Check Up**<br>(i) Pelvic Examination<br>(a) Local Examination<br>(b) Per Vaginum (PV)<br>(c) Per Speculum<br>(ii) Surgical Examination<br>(iii) Breast Examination |

| | |
|---|---|
| 14. | (i) Urological Examination (For Men Only)<br>(ii) Rectal Examination (For Men Only) |
| 15. | **Systemic Examination**<br>(i) Resp. System (Respiratory System)<br>PFT (Pulmonary Function test)<br>(ii) CVS (Cardiovascular System)<br>(iii) Abdomen<br>(iv) CNS (Central Nervous System)<br>(v) Locomotor System<br>(vi) Dental Examination |
| 16. | **Eye Examination**<br>(i) Distant Vision<br>(ii) Vision with Glasses<br>(iii) Colour Vision<br>(iv) Tonometry<br>(v) Fundus Examination |
| 17. | **ENT**<br>(i) Oral Cavity<br>(ii) Nose<br>(iii) Throat & Neck<br>(iv) Larynx |

**B. Medical Report of the Officer**

| | | |
|---|---|---|
| 1. | Haemoglobin level of the officer | Normal/Low |
| 2 | Blood Sugar Level/HbA 1C level | Satisfactory/Normal/High/Low |
| 3 | Cholesterol level of the officer | Normal/High/Low |
| 4 | Liver functioning | Satisfactory/normal/dysfunctioning |
| 5 | Kidney Status | Normal/Both-one kidney not functional optimally |
| 6 | Cardiac Status | Normal/enlarged/blocked/not normal |
| 7 | BMI (Body Mass Index) | Normal /High |

**C: Summary of Medical Report (only copy of this part is to be attached to PAR)**

| | | |
|---|---|---|
| 1. | Overall Health of the Officer | |
| 2. | Any other remarks based on the health medical check-up of the officer | |
| 3. | Health profile grading | Excellent/Very Good/Good/Average |

Date:

Signature of Medical Authority

Designation: